The Last Chapter of a Persian work entitled the Goolistan of Sadee

Translated into Marathee

5 As

# पुष्पवन

ह्मणजे फारसी भाषेंत गुलिस्तान ह्मणून सादि कवीचा ग्रंथ आहे त्याच्या शेवटच्या अध्यायाचें मराठी भाषांतर- "यंत्रज्ञान" वगैरे ग्रंथ करणाऱ्यानें केलें. आणि कृष्णाजी त्र्यंबक रानडे यांणीं

पुणें येथे

ज्ञानप्रकाश छापखान्यांत

छापिलें.

सन १८६९

किंमत ।-



# अनुक्रमणिका.

# प्रस्तावना

फारसी भाषाही सांप्रत हिंदुस्थान चे ईशान्येस काबुलखंदाराकडे इराणदेश ह्मणून आहे तेथें ते लोक आहेत त्यांचें नाव फारस किंवा मोंगल त्यांची भाषा ती फारसी त्या भाषेंत मोठे मोठे विद्वानानीं उत्कृष्ट ग्रंथ केले आहेत व ती भाषाही मधुरपणा मुळें व शब्दसंग्रहामुळें मोठी प्रख्यात आहे सदरहू देशांत षीराज ह्मणून एक मोठे शहर आहे तेथें " सादी" यानावें मोठा कवी सत्पुरुष परमार्थी होता त्याणें ग्रंथ केले त्यांतील गुलिस्तान ह्मणजे पुष्पवान् हा ग्रंथ बहुत प्रख्यात आहे असा दुसरा कोणचा ही ग्रंथ प्रख्यात नाहीं. व हिंदुस्थानातहीमुसलमानलोक इत्यादि मुलांस प्रथम पन्दनामा व गुलिस्तान शिकवितात कारण कीं त्यात नीतिबोध फार आहे गुलिस्तान हा ग्रंथ मोठा आहे त्याचे आठ अध्याय आहेत त्यांत

ल शेवटला अध्याय विशेषेंकरून चमत्कारिक आहे यास्तव त्याचें भाषांतर मराठींत केलें आहे. जे चिकित्सक व फारसी शिकणारे आहेत त्यास याचा फार उपयोग पडेल व ज्या ग्रंथांत या देशाचे व इराणचे मुसलमान लोक ह्मणतात कीं ज्यास सर्व शाहाणपण आहे त्यास या ग्रंथाचा मासला हीस मजेल. म्लेंछांचा उपदेश हिंदुचे उपदेशाहून भिन्न आहे तेंही समजेल. मूळच्या ग्रंथाची भाषा उत्कृष्ट आहे ह्मणून त्याचा रस तरजम्यांत येणार नाहीं परंतु अर्थ ध्यानांत येईल व शाहाणपणाच्या गोष्टी कळतील. हा तरजुमा करणाराचा हेतु इतकाच आहे कीं आपल्यापासून स्वदेशीय लोकांस जर कांहीं तरी उपयोग होईल तर श्रमाचें सार्थक होईल.

## माहिती.

म्लेंछ, यवन, मुसलमान, हे शब्द या देशांत प्रसिद्ध आहेत परंतु समग्र अर्थ त्याचा कोणास माहीत नाहीं याजकरितां येथें संक्षेपें करून लिहितों.

प्राचीनकाळीं श्रीरामचंद्र व पांडव राज्य करीत होते तेव्हां हिंदुलोक मात्र भूतळावर शाहाणे होते इतर सर्व अज्ञान होते म्हणून हिंदुलोकांनीं सर्व इतरदेशांतील लोकांस म्लेंछ असें नाव ठेविलें त्याचा अर्थ मूर्ख आणि धर्मज्ञानरहितलोक असा आहे. पुढें ते मूर्ख लोक काळेंकरून शाहाणे होऊन त्यांणी राज्य स्थापन स्वतंत्र केलें आणि यावनदेश म्हणून फारसी भाषेंत प्रसिद्ध आहे व संस्कृत भाषेंतही प्रसिद्ध आहे त्यास इंग्रेजींत ग्रीसदेश म्हणतात त्या देशाचे लोक म्हणजे यवन हे लोक हिंदुस्थानचे लोकांस प्राचीन काळापासून मा

हीत आहेत. काळीयवन तो त्या देशाचा हो
ता व शिकंदर याणें दोन हजार वर्षापूर्वी का
श्मीरापर्यंत अंमल बसविला होता तो यव
न होता व आणखी असें दिसतें कीं ज्योति
षा प्रकरणीं ग्रंथ यवनांपासून हिंदु लोकांनीं
पुष्कळ घेऊन संस्कृत भाषेंत तरजमे करून
ठेविले आहेत त्यामध्यें संज्ञाशब्द अद्यापि
फारसि आहेत असे ग्रंथ घेतलेले ते ताज
क ह्मणून ज्योतिषाचा भाग प्रसिद्ध आहे. र
मल ही रीति त्यांची आहे याप्रमाणें यावन
देशांतील लोकांची हिंदुस्थानांत रहदारी
होती असें सिद्ध आहे.

अणखीं असा ठिकाण लागतो कीं हिं
दुलोकांमध्यें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, अ
शा चार जाती आहेत त्यापैकीं कितीएक क्ष
त्रिय भ्रष्ट होऊन ते हिंदुस्थाना बाहेरचे मुल
खांत राहावयास गेले त्यांणीं अष्टदश वसा
हती केल्या त यवन फारस इत्यादिक आहेत फ्र

तु यावनाचा धर्म ५३४ शके शालिवाहन पर्यंत कांहीसा हिंदुस्थानांत होता त्यावर्षी महंमद यानावचा एक आरब होता त्याणें कुराण यानावचें एक पुस्तक लिहिलें आणि तें मला ईश्वरानें दिल्हें आहे या धर्माप्रमाणें सर्वांनीं चालावें न चालतील त्यांचें पारिपत्य करावें असें प्रत्यक्ष साक्षात्कार झाला असें वर्तमान लोकांत उठऊन पहिला धर्म बुडवून नवीन धर्म स्थापन केला. त्याचें नाव इमान असें आरबि भाषेंत ह्मणतात. आणि इमान धर्माप्रमाणें चालणारे त्यांस मुसलमान हा शब्द आहे हा शब्द देशवाचक नाहीं धर्म वाचक आहे. ह्मणजे आरबस्थानचा आरब असो अथवा तुर्कस्थानचा तुर्क किंवा इराणचा इराणी असो तत्रापि इमान जो कबुल करील तो मुसलमान ह्मणावा. महंमद याणें नवीन धर्म स्थापनेचा उद्योग केला तेव्हां त्यास शत्रु बहुत झाले ते त्याणें मारून आपणअ

रवेरीस आरबस्थानचे मका शहर आहे तेथें राज्य करूं लागला. त्याचे पुढें जे बादषाह झाले त्यांणी तोच उद्योग केला याजमुळें सातआठ देशांत सर्व लोक मुसलमान झाले.

हिंदुस्थानांत मोंगल लोक मुसलमान पहिल्यानें आले त्यांणी येथें राज्य बळकावून पांच साहा शें वर्षें अंमल केला. आणि जे आले ते येथेंच राहिले. परत गेले नाहींत याम्तव इकडे मुसलमान आहेत. मोंगल ह्मणजे हिंदुस्थानचे ईशान्येस देश इराणचा भाग आहे तेथील लोक.

म्लेंछ हा शब्द जितके लोक हिंदु धर्मातील नाहींत तितक्यांस लागू पडेल ह्मणजे म्लेंछ हा देशवाचक शब्द नाहीं परंतु त्याचा अर्थ इतकाच कीं जो मनुष्य हिंदुधर्माप्रमाणें चालत नाहीं तो म्लेंछ तो कोणचेही देशांतील असो याप्रमाणें इंग्रेज, फरासीस तुर्क, आरब, इराणी, मोंगल इत्यादि जे

सर्व म्लेंछ आहेत. व यवन हा शब्द देशावाचक आहे. सांप्रत यावन देशाचा यवन हिंदुस्थानांत नाहीं व हाल्लीं यवनलोक हे मुसलमान नाहींत परंतु क्रिश्चियन आहेत व यावन भाषाही आतां कोणी बोलत नाहींत. तेथें दुसरी भाषा बोलतात. आतां मुसलमान मात्र हिंदुस्थानांत पुष्कळ आहेत परंतु ते धर्मेंकरून मुसलमान देशेंकरून कोणी आरब आहेत कोणी इराणी आहेत कोणी तुर्क आहेत व कोणी हिंदुस्थानांत पिढ्या दर पिढ्या राहिलेले मुसलमान हे जे गांवोगांव आहेत ते मूळचे मोंगल आहेत.

हिंदुस्थानांत पहिल्या दाहा भाषा प्राकृत चालत होत्या त्या दाहा भाषा संस्कृत लोकांनीं टाकून उत्पन्न केल्या हीं सर्वत्र चाल आहे कीं भाषा इतर पदार्थांसारिखी जरायुक्त होऊन तिचा त्याग लोक क

करितात याप्रमाणें त्याग केलेल्या भाषा हा
लीं लाटीन; ग्रीक, संस्कृत, वगैरे आहेत त्या
प्राचीन काळीं बोलत होते पुढें त्या बंद झा
ल्या तेव्हां संस्कृत बंद होऊन सरासरी चार
हजार वर्षे झालीं असावीं नंतर प्राकृत भा
षा झाल्या त्यांतील एक देवनगरी ह्मणजे प
रदेशी लोक बोलतात ती. बाळबोध अक्ष
रांनी लिहितात व त्यांत संस्कृत शब्द फार
मिसळ आहेत ती भाषा मोंगल आल्यावर
बिघडून त्यांत फारसी व आरबी शब्द मि-
सळले उदाहरण

भगवानूजीकी क्रपाहै तो सुखपावेगा
यांत संस्कृत शब्द आहेत. ही भाषा हिंदा प
हिली हिंदुलोकांची आहे.

नंतर मुसलमान लोकांच्या योगानें त्या
भाषेची उर्दु भाषा झाली ह्मणजे

अल्लाकी फजलहै तो आदमानी भयसं
र होगी.

यांत फारशी शब्द पडले ही भाषा हाली जे मुसलमान लोक हिंदुस्थानांत आहेत ती बोलतात ह्मणून या भाषेस सामान्यलोक मुसलमानी भाषा ह्मणतात परंतु पहिल्यानें सांगीतलेली हिंदीभाषा जी आहे ती वबीज भाखा त्यासारिखी आहे त्यांत हिंदुस्थानांत पुराणे सांगतात व ब्राह्मण देवपूजेंत हीबो लतात ती हिंदुलोकांचीच आहे.

या प्रमाणें हिंदुस्थानचे व इतर देशाचे इतिहास पाहिल्यावरून माहीतगारी निघ ते व आणखी पुष्कळ हिकडील लोकांस ठाऊक नाहींत अशा आहेत जरी याच दे-शांत या गोष्टी घडल्या आहेत तरी त्याची शु द्ध लोकांस नाहीं याचें कारण अज्ञान फार जाहालें आहे व विद्या फार कमी जाहाली ज्या प्राचीनकाळीं हिंदुलोक विद्येवर चित्त देत होते तेव्हां असे वेडे नव्हते त्यांणी त्यासमयीं जितका शोध लागेल तितका काढला आहे

व त्यांस सर्व माहिती होती आलीकडे दोन
तीन हजार वर्षे या देशांतील लोकांस ईश्वर
इच्छेनें गाढ निद्रा लागून सर्व विसरले व त्याचा
कारभार त्यांस आटोपेना जसा वृद्ध मनुष्यास
हात द्यावा लागतो तद्वत या लोकांस सर्व वि
द्या शिकवून तयार केले पाहिजेत तेव्हां हे भा
नावर येतील व भ्रांती जातील.

# गुलिस्तान

## अध्याय ८

## वागण्याचे रीती विषयी

१ द्रव्याचा उपयोग इतकाच कीं आयुष्यांत सुख व्हावें परंतु द्रव्य मिळवावें इतकाच उपयोग आयुष्याचा नाहीं. एका ब्राह्मण्यास प्रश्न केला कीं सद्भाग्य पुरुष कोण? आणि दुर्भाग्य पुरुष कोण? त्याणें उत्तर दिल्हें कीं ज्याणें भोगलें आणि पेरलें. आणि त्यास दुर्भाग्य ह्मणावा कीं जो मृत्यु पावला आणि जागच्या जागीं ठेवलें. ज्या मूर्खानें आपलें आयुष्य मिळविण्यांत घालविलें आणि सार्थक कांहीं केलें नाहीं. व धर्म केला नाहीं त्या तुछ माणसास बरा आणि भला ह्मणून का.

२ एका कृपण राजास एका साधुनें उपदेश केला कीं अरे जसें ईश्वरानें तुला दिल्हें तसेंच तूं दुसऱ्यास दे. परंतु त्यास तो बोध ठसला

नाहीं. आणि अंती त्याची अवस्था वाईट झा
ली. द्रव्यापासून कोणानें कल्याण केलें नाहीं
आणि आपले जन्माचें सार्थक गमावून बसला
आणि परलोकास मुकला. याजकरितां जरया
जगांतील द्रव्यापासून तुझा उपयोग व्हावा अ
सें मनांत असलें तर जसें ईश्वरानें तुला दिल्हें
आहे तसेच तुझे सारखे इतर प्राणी असतील
त्यांजवर कृपा कर. आरबीलोकांमध्यें ह्मणआ
हे कीं उपकार करीतजा परंतु उपकार केल्याची
अहंता मानूं नको. ह्मणजे त्या उपकाराचें फळ
तुला होईल. उपकाराचें पुण्य असें आहे कीं त्या
चें झाड आकाशा इतकें उंच वाढतें परंतु जर तु
झ्या मनांत त्या झाडाचें फळ भक्षावयाचें असे
ल तर त्याला छेदूं नको. ईश्वरानें तुझ्यावर कृ
पा केली आणि सद्बुद्धि दिल्ही याजव ईश्वरा
ची स्तुती कर. तुला राजाजवळ चाकरी मो
ठी असली तर बडाई करूं नको. पण ईश्वरा
ची स्तुती कर कीं ज्याणें तुला राजाश्रय करू

न दिल्हा आहे.

३ दोन प्रकारचे मनुष्य मेहेनत व्यर्थ करी तात व कष्ट फुकट भोगितात. एक ज्याणें द्रव्य संपादन केलें परंतु भोगिलें नाहीं. दुसरा, शास्त्र विद्याध्ययन केलें परंतु तशी वर्तणूक केली नाहीं. जरी कितीही विद्या शिकलेत व शिकव लीत परंतु जर ज्ञानरूप वागणूक नसेल तर व्यर्थ आहे. बैलावर पुस्तकांचा भार घातला ह्मणून कांहीं तो विद्वान् होईल कीं काय? त्यास गोणी आणि पुस्तकें सारखी आहेत तद्वत् क्रियाभ्रष्ट विद्वान् आहे.

४ विद्या व ज्ञान यांचा उपयोग इतका आहे कीं तेणेंकरून परमार्थ साधन प्राप्त होनें आणि परलोकची तयारी करणें हाच विद्येचा उपयोग आहे. केवळ प्रपंचांत रोजगार धंदा मिळावा हा उपयोग विद्येचा नाहीं ज्याणें विद्या पुष्कळ केली आणि तिचा जो उपयोग करावयाचा तो न करितां द्रव्य संपादन इत्यादि इह लौकिक कार्ये-

मात्र केली तो जसा घर बांधून आपले हाता नें अग्नी लाऊन देतो त्याप्रमाणें आहे.

५ ज्याणें ज्ञान संपादन केलें आणि जो त्या प्रमाणें वागत नाहीं त्याची साम्यता आंधळ्या मशालचीची आहे. दुसऱ्यास उजेड दाखवितो परंतु स्वतां आंधेरांतच चाचपीत फिरतो ज्याणें जन्मास येउन कांहीं परलोकाचें साधन केलें नाहीं तो जसा पैक्याची थैली पाण्यांत ओतणारा व कांहीं विकत न घेणारा असतो तसा समजावा.

६ ब्राह्मणे लोकांकडून राज्यास व देशास शोभा असते. पवित्र लोकांकडून धर्मास शोभा असते. ब्राह्मणे आहेत त्यांस राजाची गरज लागत नाहीं परंतु राजास ब्राह्मण्याची गरज फार आहे अहो राजानो माझा उपदेश ऐका? या माझ्या उपदेशासारिखी गोष्ट हिताची कोणी सांगणार नाहीं ती कोण ती ह्मणाल तर ऐका ब्राह्मणे लोकांकडे राज्याचा कारभार सांगावा जरी

ते कारभार करण्यास झटणार नाहीं व हें त्यांचें काम ही नव्हे तथापि त्यांस अवश्य आणून संग्रह करावा

७ तीन वस्तु तीन वस्तु शिवाय शाश्वत नाहींत. द्रव्य व्यापारावांचून व विद्या पढण्यावांचून व देश राजा वांचून

८ दुष्टाची दया केली ह्मणजे चांगल्याचें वाईट केलें असें आहे. आणि उपद्रव कर्त्याची क्षमा केली ह्मणजे गरीबास त्रास दिल्यासारखें आहे. दुष्टाचा जरी कितीही प्रतिपाळ केला तरी तो पाप दृष्टीनें अवलोकन करण्यास राहणार नाहीं.

९ राजाचे मैत्रीवर भरवसा किमपि ठेवूं नये व लाहान स्त्रियांचे कंठ चांगले ह्मणून गर्व करूं नका कारण कितीएका निमिष्यांत जाईल हे तारुण्यांत बदलेल. ज्याचे पुष्कळ स्नेही आहेत त्यासी स्नेह करूं नये आणि केला तर तो सुटेल हें अगोधरच समज.

१० जी आपले पोटांत नाजूक गोष्ट असेल ती स्नेह्यास ही सांगूनये. कारण कीं नजाणो एखादे समयीं तोच शत्रु होईल. व जितका तुझ्याने नाश करवेल तितका आपले शत्रूचा करून को कारण कीं एकाधे समयीं तो स्नेही होईल. आणि जी गोष्ट गुह्य ठेवावयाची असेल ती कोणास सांगूनये. कारण कीं आपल्यापेक्षां सावधगिरी करणार दुसरा नाहीं दुसऱ्यास सांगावें आणि त्यास ह्मणावें कीं ही गोष्ट तूं कोणास सांगूनको. त्यापेक्षां आपणच बोललें नाहीं तर चांगलें. आपले पोटांत कांही गोष्ट आहे ती बाहेर पडूं देऊं नये. कां कीं बाहेर एकदां निघाली तर गुप्त राहणार नाहीं. आणि एकांती ही असी गोष्ट बोलूं नये कीं तीच गोष्ट चौघांत निघांली असतां घसंत पडणार नाहीं.

२१ जो शत्रु आर्जव करितो व स्नेहभाव दाखवितो त्याचे मनांतील इतकाच भाव अ

सतो कीं नाश करण्याचे कोणतेही तऱ्हेनें सामर्थ्य यावें आणि एकाद्याचे मैत्रीवरही भरंवसा ठेववत नाहीं मग शत्रुचे मैत्रीवर भरंवसा कसा ठेवावा. जो शत्रुस यत् किंचित् असें जाणतो तो विस्तवाची फुणगी राखतो त्या प्रमाणें आहे. आज तुला सामर्थ्य आहे तों विझीव उद्यां विस्तव पेटला तर सर्व गांव जाळील. तुला शत्रु मारावयाचें सामर्थ्य असलें तर त्यास धनुष्य उचलूं देऊं नको. अगोधर तीर सोड.

१२ दोन शत्रु असतील आणि त्याचे दरम्यान बोलावयाचा प्रसंग येईल तर असें बोल कीं दोघे मैत्र झाले असतां तुझ्यावर शब्द येणार नाहीं. दोघांमध्यें कलह झाला ह्मणजे तोच अग्नि आहे. त्यांत तेल ओतणारा चाहाड मनुष्य आहे त्या दोघांची मैत्री झाली ह्मणजे जो चाहाड असतो त्यास लज्या प्राप्त होते यास्तव दोघांमध्यें कलह लावणें आणि शेवटीं आपल्यास त्यांत जाळणें हें शाहाण्याचें

काम नाहीं. मित्रासी ही बोलत असतां सावधरा हा, तुझ्यापाठीमागें एकादा तुझा शत्रु उभा अ सेल. पडद्याचे आंत बोलत असला तर बाहेर कोण आहे याचा अधीं विचार कर.

१३ आपल्या मैत्राचे जे शत्रु आहेत, त्याशीं जो स्नेह करितो त्याचे मनांत त्या मैत्राचें कांहीं तरीं वाईट करावें असें असतें, ह्मणून आपला मि त्र जर आपले शत्रुसीं स्नेह करणारा असेल त र त्याची मैत्री सोडून द्यावी.

१४ तुजकडे जेव्हां मोठें काम होईल तेव्हां लोकांस उपद्रव करूं नको. आणि केल्याशिवाय तें काम निभावण्याची तजवीज कर. जो मनु ष्य आपल्यासीं नीट बोलेल त्याशीं कडू बोलूं नको. आणि ज्याच्या मनांत स्नेह करावयाचा अ सेल त्याशीं शत्रुत्व करूं नको.

१५ जोंपर्यंत पैका जावून काम होईल तोंप र्यंत जीवास दुःख देऊं नको, सर्व उपाय राहातील तेव्हां मग तरवार उपसणें योग्यच आहे.

१६ शत्रू कसाही असो, त्याची दया करूं नये. कारणकीं त्याचा ज्या वेळेस हात चालेल त्या वेळेस कधीं नाश करण्यास कमी करणार नाहीं, आणि शत्रु अशक्त आहे ह्मणून आपल्यास शाबासकी देऊं नको. कारण कीं तो अशक्ताचा सशक्त होईल. ज्याणें दुष्टास मारलें त्याणें लोकांस त्याचे उपद्रवापासून सोडिवलें आणि त्याला ईश्वराचे दंडापासून सोडिवलें. दया करणें योग्य आहे, परंतु तसें करण्यांत लोकांस उपद्रव देऊं नये, ज्याणें सापावर दया केली त्याणें मनुष्याचा प्राण घेतला असें समज.

१७ शत्रुचे बुद्धिवादानें चालूं नये, परंतु त्याची बुद्धि ऐकावी, आणि तो सांगेल तें सोडून दुसरा मार्ग धरावा, आणि निर्भय आहे असें जाणावें, शत्रूनें सांगितलें कीं अरे हें कर तर तेथें घात आहे असें समज, आणि त्याणें उजवीकडे जाण्यास सांगितलें तर डावेकडे जा ह्मणजे निर्भय आहे

१८ अतिशय क्रोधापासून विस्मृति प्राप्त होत आहे. असलेवर कृपा केली तर आपला वक्र कमी होतो यास्तव इतका दार्ढ्यपणा करूंनको कीं लोकांस त्रास होईल आणि इतकासालसपणा करूंनको कीं लोक धिट होतील कांहीं दार्ढ्यपणा कांहीं नरमपणा केला ह्मणजे चांगलें जसें दुःख झालें ह्मणजे वैद्य शस्त्र लावतो आणि वर मलम भरतो तसें जो शाहाणा आहे तो फार तीक्ष्णता दाखवीत नाहीं आणि फार थंडेपणाकरून आपली प्रतिष्ठा कमी करीतनाहीं. तेणेंकरून आपली प्रतिष्ठा कमी होऊंदेतनाहीं. आणि हलकेपणा करीतनाहीं. एक मेंढक्याचा मुलगा आपले बापास पुसता झाला ह्मातार्या तूं फार पाहिलेंस आहे तर मला एक चांगली बुद्धि सांग. हें ऐकून सांगता झाला. बाबा भलेपणा इतका कामाचा नाहीं. कीं लांडगे धिट होऊन उपद्रव करितील.

१९ दोन पुरुष देशांत आणि धर्मात कंटक आहेत एक राजा निर्दय आणि दुसरा साधुवेष आणि ज्ञान नाहीं देशांत असा राजा नसो कीं जो ईश्वराची सेवा करीत नाहीं.

२० राजानें शत्रुस पराकाष्टेचा त्रास देउं नये. कारण की मैत्रही भितात आणि राग आला ह्मणजे स्वतां आपल्यास त्रास होतो नंतर दुसऱ्याचें काय होईल तें होऊ. मनुष्य मातीचा घडलेला आहे. त्यास हें योग्य नाहीं की गर्व, उन्मत्तपणा, आणि दांडगेपणा करावा. असा उन्मत्तपणा केला तर लोक ह्मणतील कीं हा मातीचा घडलेला नाहीं विस्तवाचा घडलेला आहे, एका शाहरांत एक विद्वान ग्रहस्त गेला तेथें एका सत्पुरुषाची त्याची गांठ पडली, आणि विनंती केली कीं, माझें अज्ञान दूर कर, त्याणें सांगितलें तुझें शरीर ही माती आहे, याचा विचार कर नाहीतर तूं आपली सर्व विद्या मातींत घालशील.

२१ दुष्ट स्वभावी मनुष्य आपले वैरियाचे बंदिशाळेंत राहतो, कारण कीं तो जेथें जातो तेथें त्यास सर्व मारावयास उठतात, दुःस्वभावी मनुष्य पृथ्वी सोडून आकाशांत गेला, तरी त्यास त्यास अनर्थच प्राप्त होईल, कारण की त्याचा दुस्वभाव त्या बरोबरच आहे.

२२ दुसऱ्याचे लष्करांत फाटफुट झाली ह्मणजे आपण स्वस्थ राहावें, ते एकत्र असले ह्मणजे आपली फाटफुट होईल, ह्मणून भय बाळगावें, आपले शत्रु भांडत असले ह्मणजे आपल्यास कांहीं फिकीर नाहीं, आणि ते एकत्र जमावानें असले तर आपली तयारी ठेवावी.

२३ शत्रूचा कांहीं उपाय चालेनासा झाला ह्मणजे तो स्नेह करितो, आणि जे शत्रुपणानें जें साध्य झालें नाहीं तें स्नेहानें साध्य करितो.

२४ सापाची फडी शत्रूच्या हातानें ठेचं ह्मणजे दोहोंतून एक तरी लाभ होईल सर्प तरी मरेल नाहींतर शत्रूतरी मरेल लढाईचे दि

वशीं गरीब जरी शत्रु असेल तरी त्यापासू न निर्भय राहूं नको, कारण कीं जर त्याणें जिवाची आशा सोडली; तर दुबळा वाघासही मारील.

२५ ज्या वर्तमानें, दुसऱ्याचे चित्तास दुःख होईल, असें असेल तें त्याला सांगूं नको, दुसऱ्या लोकांनीं सांगितलें ह्मणजे तूं बोल, तेथपर्यंत बोलूं नको. कोकिळा ओरडली ह्मणजे वसंत आला असें जाणतात, आणि घुबड ओरडला ह्मणजे विघ्न आहे असें जाणतात, तसें दुष्टानें दुष्टवार्ता सांगावी. आपण चांगली सांगावी.

२६ राजास कोणाचें व्यंग कळवूं नये. जर तुला पकें ठाऊक असेल कीं मी सांगेन तें खरें होईल तर सांग, नाहीं तर तूं आपला घात करशील. भाषण करणें तें तेव्हां कर कीं तुझें कोणी ऐकेल. नाहीं तर बोलण्यासारिखा उत्कृष्ट पदार्थ ईश्वरानें दिल्हा आ-

अग्नि आहे त्यापासून दूर राहावें आणि नरक टा
क कारण कीं नरकांतील दुःख तुझ्यानें सोसवणा
र नाहीं यास्तव आज विषय त्यागापासून दुःख
होईल तें सोस आणि दुःसह दुःख टाळ.

३२ जो हातीं असतां चांगलें करीतनाहीं
त्याचे हातची शक्ति गेली ह्मणजे फार कठीण
आहे. मनुष्यास इजा देण्यासारिखें दुसरें दुःखा
स कारण नाहीं. कां कीं त्यास प्रसंगीं कोणी उप
योगी पडत नाहीं.

३३ प्राण एका श्वासावर आहे आणि मनु
ष्याची उत्पत्तीचे मागें पुढें पाहिलें तर कांहीं नाहीं
जे प्रपंचा करितां धर्माची हानि करितात ते गर्दभ
आहेत ते जवाहीर फुकट विकतात ईश्वरानें पा
करण्याकरितां मनुष्यास निर्माण केलें नाहीं यास्त
व तुह्मी पाप बुद्धि धरून पुण्यमार्ग सोडूं नका ईश्व
रानें तुह्मास उत्पन्न केलें आणि तुह्मी पाप कराव
यास आरंभितां हे योग्य नाहीं.

३४ पुण्यवान् आहेत त्याजवर यमाची शक्ति

चालत नाहीं आणि राजाची शक्ति गरीबावर चा लत नाही. परंतु जो संध्या करीत नाहीं त्यास उस नें कांहीं देऊं नका. कारण कीं जो देवाच्या आ ज्ञा मोजीत नाहीं तो तुझ्या देण्याघेण्यास काय मोजील. एकादेशांत एक चिनी भांडे करावयास चाळीस वर्षे लागतात आणि दुसरे ठिकाणीं ए का दिवसांत शंभर करितात परंतु तेथें त्याची किंमत नाही. पक्ष्याचे पिलूं अंड्या बाहेर येतां च खाण्यास लागतें मनुष्याचे पोरास कांहीं कळ त नाहीं. परंतु पाहा कीं जे आरंभीं शाहाणें ते पुढें तरबेज होतनाहीं. आणि जे आरंभीं अशक्त ते ह ळू हळू फार योग्यतेस चढतात. कांच सर्व ठिकाणीआ हे ह्मणून त्याची कोणी किंमत देत नाहींआणि मा णीक मिळावयास श्रम पडतात यास्तव त्याची किंमत फार देतात.

३५ सावकाशीने व सावधगिरीनें करीलत्या चे कामं होतें आणि जलदीनें करील त्याचें बुडतें एकदां असें झालें कीं एक जलदी चालत होता ट

सरा सावकास जाल होता परंतु सावकास जाणा रा अखेरीस जलद चालणाऱ्या पुढें गेला. घोडा पळत उडत जात होता तो थकला. आणि सावका स जाणारा उंट निभावला.

३६ मूर्ख आहे त्याणें उगीच बसावें या सा रखें गोष्ट नाहीं ही जर तो समजेल तर त्यासको णी मूर्ख ह्मणणार नाहींत आपल्यामध्यें गूण आणि शाहाणपण नाहीं तेव्हां हेंच वरें कीं जिभे स खीळ घालावी कारण कीं भाषणानें मनुष्याचे दोष प्रगट होतात आणि नारळांत खोबरें नाहीं असें समजलें ह्मणजे करवंटीस कोणी पुसतना हीं. एक मूर्ख गाढवास विद्या शिकवीतां शिकवि तां त्याणें आपलें आयुष्य घालविलें एक शाहा णा हें पाहून ह्मणाला अरे मूर्खा हा काय उद्योग करितोस तुला मूर्खमात्र अशानें ह्मणतात जन्मा वरास भाषण तूं किती शिकविलेंस तरी येणार नाहीं परंतु त्यापासून उगीच बसण्याची विद्या शीक विचार केल्यावांचून जो उत्तर देतो त्याचें उ

त्तर चांगलें बहुधा असणार नाहीं बोलणें तर चांगले माणसा सारखें बोल नाहीं तर जनावरासारखा उगीच बैस.

३७ दुसऱ्यानीं तुला शाहाणा ह्मणावा ह्मणून जेव्हां तूं आपल्याहून शाहाण्याशीं वाद घालतोस तेव्हां तुला मूर्खमात्र ह्मणतात जेव्हां तुझ्याहून चांगले कोणी बोलत असेल आणि तुला कळत असलें तरी त्यांत तोंड मध्यें घालूं नये.

३८ जो दुष्टाची संगति करितो त्याची अवस्था चांगली नाहीं. देवानीं राक्षसासी संगत केली तर त्यांचे दुर्गुण व कपट त्यांस लागतील आणि दुष्टापासून तुला सद्गुण प्राप्त होणार नाहींत जसें लांडगा कांनडी फाडणारा तो त्यास कशी कामवील.

३९ दुसऱ्याचें व्यंग प्रगट करूं नये. कारण कीं त्यांत त्याची अप्रतिष्ठा होते व तुझी अबरू जाते.

४० ज्याणें विद्या संपादिली आणि त्याप्र माणें वर्तला नाहीं तो त्या शेत कऱ्या सारखा आहे. ज्याणें नागरलें आणि पेरलें नाहीं.

४१ ज्याचें चित्त ठिकाणी नाहीं त्याच्यानें ईश्वराची सेवा घडत नाहीं जसें बदामाचा मो खा शिवाय उपयोग नाहीं.

४२ भांडावयास सिद्ध पुष्कळ असतात पण ते सर्व कामांत हुशार असतात वरून चांगले दि सतात पण आंत पुष्कळ वाईट असतात.

४३ जर सर्वरात्री चांदण्याच्या झाल्या तर चांदण्यास कोण पुसतो जर सर्व दगड माणकें झालीं तर दगड आणि रत्नें सारखींच होतील.

४४ जो दर्शनांत चांगला दिसतो तो अभ्यंत रानें बहुधा चांगला नसतो. यास्तव लक्ष अंतरीं ठे वावें बाह्यत्कारी ठेऊनये. एक दिवसांत मनुष्या चें ज्ञान किती आहे याचा विचार केला तर समजे ल परंतु मनुष्याचे पोटांतील दुष्टभाव आहे तो व र्षानीं वर्षे समजत नाहीं यास्तव समजेल असान

खातरजमेनें राहूंनये व खुशाली मानूनये.

४५ थोराशीं कलह करणें ह्मणजे आप ला नाश करणें आपल्यास थोर समजतो तो काणा ह्मणावा ज्यास एक पदार्थाचे दोन दिस तात. जो मेढ्याशीं टकर करील त्याचें डोकें लौकरच फुटेल.

४६ वाघावर चापट मारणें आणि तर वारीवर मूठ मारणें हें शाहण्याचें काम नव्हे वरिष्टाशीं लढाई करूंनको व उलटून गोष्ट सांगूनको. तो लढाईस उभा राहील तर पळू न जा हें चांगलें.

४७ दुर्बळानें बळवानाशीं धिटपणा के ला तर आपले मरणारे शत्रूस आपणच सा ह्य जाहाल्यासारखें आहे. जो घराबाहेर पडला नाहीं त्याणें शिपायाबरोबर लढाईचे मेदानां त काय जावें. आणि बुजा आंगानें चिलखत ज्याचे आंगांत आहे त्याशी लढाईस काय जावें.

४८ जो दुसऱ्याचें शाहणपण ऐकत नाहीं तो निंदेस पात्र होतो. ज्याला दुसऱ्याचा बुद्धिवाद ठसत नाहीं त्याला लोक नाव ठेवूं लागले ह्मणजे त्यास उगीच मान खाली घालून बसावें लागतें.

४९ मूर्ख लोक जे आहेत ते शाहण्यास पाहूं सकत नाहीं जसे कुत्रे घरांतले असतात ते षीकारी कुतऱ्यास पाहून गलबा करितात पण पुढें येवत नाहीं.

५० नादान मनुष्य विद्येंत दुसऱ्याची बरोबरी झाली नाहीं ह्मणजे त्यानीं दुष्टपणानें भांडावयास उठतो दुष्ट आहे तो पाठीमागें बडबड पुष्कळ करितो कारण कीं समोर गांठ पडली ह्मणजे त्याची बोलकी जीभ मुकी होत असती.

५१ जर पोटाची काळजी नसती तर पक्षी जाळ्यांत सांपडतेना आणि पारधी जाळींहीं पसरतेना. पोट हें हातापायांची बिडी आहे पो

याचे पाठीस लागला त्याच्यानें देवाची ही भक्ति घडतनाहीं.

५२ वैद्य आहेत ते थोडें खातात ग्रहस्थवे तानें. तपस्वी, सन्यासी, किंचित् . तरणे सरे तों पावेतों. व म्हातारे जिरे तों पावेतों व भट्ट दमला गे तों खातात. आणि पोटांत रिकामी जागा ठेवी त नाहींत. पोटावर लक्षदेणार आहे त्यास दो न दिवस झोंप येतनाहीं एक दिवस फार खालें ह्मणून दुसरे दिवसीं कांहींच नाहीं ह्मणून.

५३ स्त्रीपाशीं मसलत घेणें नाश आहे. दगेखोराची दया करणें हा अपराध आहे.

५४ ज्याचे हातीं शत्रु सांपडला आणि त्या चा नाश न केला तर आपला शत्रु आपण हो तो. आपले हातांत वरची आणि साप त्याचे खालीं सांपडला असतां मारण्यास उशीर शा हाणा करीतनाहीं. वाघाची दया केली ह्मणजे धकऱ्यास मरण होतें. कोणाचा अभिप्राय असा आहे कीं जे कैदेंत सांपडले आणि हातीं आले-

त्यांस मारण्याचा विचार करावा कारण की आ
पले हातीं आहे तो मारूं सकतो आणि सोडूं सकतो
परंतु एकदां मारला असतां पुन्हा तजवीज क
रणें हातीं नाहीं. जीवंतास मारूं सकतात पण
मेल्यास कोण उठवील यास्तव ज्याचे हातीं
तीर आहे त्याणें विचार करावा कीं सोडला
असतां पुन्हा माघारा येणार नाहीं.

५५ मूर्खासीं आणि शाहण्याशीं संग्रा
म झाला ह्मणजे शाहाण्यानें प्रतिष्ठेची आ
शा धरूं नये. व मूर्ख तोंडाळपणानें शाहण्या
चा पराजय करील हें आश्चर्य नाहीं. कारण
कीं दगडानें मोतीं छेदतात कोकिळा आ
णि कावळा एका पिंजऱ्यांत ठेविली तर को
किळा बोलणार नाहीं यानें आश्चर्य काय
गुणवानास बेकूब उपद्रव करूं लागला तर
गुणवानानें दुःख मानूं नये. व राग येऊं देऊं
नये. कारण कीं एका धोंड्यानें सोन्याचें भां
डें फोडलें तरी दगडाची किंमत चढत नाहीं

आणि सोन्याची उतरत नाहीं.

९६ शाहणा बेकुबाचे सभेंत बोलत नाहीं आणि बोलला तरी त्यांत प्रतिष्ठा होत नाही. परंतु याचें आश्चर्य नाहीं. ढोल वाजत असला ह्मणजे सारंगी ऐकूं येत नाहीं. आणि अंबराचा सुवास लसणीचे घाणींत येत नाहीं. मूर्ख शाहाण्यास थकविलें ह्मणून चढून बोलतो पण त्याला असें समजत नाहीं कीं गोंधळी गोंधळ घालितात त्यांत सुस्वर गाणाराचें काय चालेल. जवाहीर चिखलांत पडलें तरी त्याची किंमत कायम राहते. आणि धूळ उडून अस्मानांत जाते पण तिची किंमत चढली असें होत नाहीं. बुद्धि नसली आणि विद्या सांगितली तर उपयोग काय. विद्या सांगितली नाहीं आणि बुद्धि आहे तरी उपयोग नाहीं. कोळसा मोठ्या पदवीचा आहे आणि बिल्लव थोर पदार्थ आहे परंतु त्यांत गूण नाहीं ह्मणून किंमत नाहीं. साखरेची

पदवी उसावरून नाहीं. परंतु स्वतां गुणावरू न आहे. व कस्तुरी आपली आपणच समज ते गंधी यांस सांगावयास नको. कीं वासचां गला आहे "चांगली कस्तुरी आहे" शाहाणा जो आहे तो वेद्याचे पेटी प्रमाणें आहे त्यांत नाद कांहीं नाहीं पण गुण मोटा आणि मुख तासे मर्ष्याच्या ढोला प्रमाणें नाद मोटा आंत कांहीं नाहीं. शाहाणा मूर्खामध्यें कसा दिसतो कीं जसी सुंदर स्त्री आंधळ्याचे समाजांत आ णि गीता यवनाचे घरांत. तसें आहे. अशी क्षे त्री व्यास होते पण तें क्षेत्र पवित्र झालें नाहींत से शाहणे याणीं मूर्खास किती सांगितलें तरीं व्यर्थ पण आपले जवळ असल्यास आपला गू ण दाखीव कारण कीं सूर्याचे पाटीं शनी आणि केवड्याला कांटे आहेतच.

५८ सद्बुद्धिस इंद्रियें जिंकतात आणि सोटी बायको नवऱ्यास गरीब करिते ज्या घरांत बाय को मोठ्यानें बोलते त्यांत सुख कोठून राहील.

५९ अधिकार नाहीं आणि ब्राह्मणपण आहे तर तें कपट कृत्रिम होतें आणि अधिकार आहे अकल नाहीं तर मूर्खपणा व वेडपणा होतो. यास्तव अर्थी ब्राह्मण पण अकलहुशारी मग राज्य नाहीं तर संपदा आणि राज्य आपलाच नाश करितील.

६० अज्ञानी ग्रहस्थ ज्याणें दान धर्म केला आणि भोगलें तो ज्ञान्यापेक्षां बरा ज्याणें द्रव्य जमविलें आणि हालानें मेला. बाहेर दाखविण्याकरितां साधेपणा धरणें तो लुच्चेगिरीपेक्षां वाईट. आणि त्यांत दोष फार. जो सन्यासी ढोंग करून देवळांत बसतो त्या मूर्खास काळे भिंगांत काय दिसेल. थोडें थोडें जमा झालें ह्मणजे फार होतें आणि एक एक दाण्याची रास होते रात्रीचे ढीग होतात. थेंब थेंब पाणी पडतां पडतां नदी होते.

६१. विद्वान याणें नीच माणसाकडून आपली अप्रतिष्ठा झाली तर क्षमा करूं नये. कारण त्यांत दोघांचाही नाश आहे. एकाची प्रतिष्ठाक

मी होते. दुसऱ्याची दांडगाई कायम होते मूर्खा
त्री विनोद आणि स्नेह करणें हें त्याचा गर्व आ-
णि दांडगाई वृद्धि होण्याचें कारण आहे.

६२ पाप कोणाकडून ही घडलें तरीं वाईट
आहे आणि विद्वानापासून जाह्यालें तर फारचां
वाईट कारण कीं पापाचें हत्यार ज्ञान आणि वि
द्या आहे आणि ज्याजवळ हत्यार आहे आणित्या
सकोणी कैद केला तर मोटी लज्जेची गोष्ट आहे
जो अज्ञान आहे त्याणें बदचाल गेरवाजबी गोष्टी
बहुत केली आणि विद्वानानें यत्किंचित् केली तरी
त्यापेक्षां तो बरा कारण कीं आंधळा होता व रस्तांचु
कला हें बरें पण डोळे दोन्ही धड होते आणि विहि
रींत गचावला तर हें वाईट आहे.

६३ ज्याणें कोणास भाकर दिल्ही नाहीं त्या-
ची कीर्ति होणार नाहीं. एक सत्पुरुष राज्यावर ब
सला असतां दुष्काळ पडला तेव्हां त्याणें असा
नेम केला कीं अर्धपोटीं जेवावयाचें ह्मणजे दुसरे
याचें दुःख समजेल. असा उपाय हा केला. बाग

राखतो त्यास फळाची गोडी गऊक होती पण यजमानास कांहींच नाहीं. जो मुळापासून सुखी आणि गर्भश्रीमंत त्यास दुसऱ्याची गरीबी कळ त नाहीं. ज्याणें गरीबी स्वतां भोगिली आहे त्यास दुसऱ्याची गरीबी समजेल. यास्तव तूं मो ठ्या चांगल्या घोड्यावर बसून जात असलास तर पाहा मागें गरीब गादव ओझें घेऊन चाल तें त्याची व्यवस्था काय आहे आणि गरीबाचे घ रीं धुंदुर्मास पुसूंन को कारणकीं त्याना एक दि वस खावयास ही मिळत नाहीं.

६४ त्रासलेले भिकारी यांस दुष्काळांत व गरीबीचे दिवसांत तुह्मी कसे आहां असें पुसूंन ये परंतु जर तुझ्यानें त्याची जखम भरवत असे ल आणि कांहीं देववत असेल तर पूस चिंताना हीं गादव ओझें घेऊंन चिखलांत फसलेलें पाहि लें तर त्याची दया अंतःकरणांत बागवावी. प ण जवळ जाऊं नये आणि जवळ गेलें तर कंमर बा धावी आणि शेपूट धरून त्यास उठवावें तर शो

भा आहे.

६५ दोन गोष्टी होतील असें बुद्धीस वाटत नाहीं एक ईश्वरानें जें दिल्हें आहे त्याहून अधीक मिळविणें आणि नेमणुकीचे अधीं मरणें. हजारों वेळ आक्रोश केला आणि हेराण जाहाले आणि देवाची स्तुती केली किंवा निंदा केली तरीं जें नियमित जाहालें ते फिरणार नाहीं ईश्वरानें वायु उत्पन्न केला तो जेव्हां सुटतो तेव्हां ह्या नारीचें जुनें पडकें घर पडलें ह्मणून काय त्यास काळजी आहे.

६६ ज्याला ईश्वरानें लक्ष्मी दिल्ही त्याणें स्वस्थ बसावें त्यास भय नाहीं आणि ज्यास यमाचें बोलावणें येईल त्याणें जावें. कारण की मग उपाय नाहीं. मेहेनत करा न करा ईश्वर देणें तें देईल आणि जरी वाघाच्या दाढेंत सांपडला तरीं [illegible]पर्यंत आयुष्य सरलें नाहीं तों पर्यंत खाणार नाहीं.

६७ जे आपल्या कपाळीं नाहीं ते हातीं येणार नाहीं. आणि जे आपलें आहे तें कोठे ही असलें

तरी येईल. राहू केतुनें काय प्रयत्न केला प रंतु अमृत मिळालें नाहींच.

६८ पारधीयास ज्या दिवशीं लाभकाळ नसतो त्या दिवशीं जाळ्यांत मासे सांपडत नाहीं आणि माशांचें मरण जवळ नसलें तर ते मृत्यु पावत नाहींत. आशाळू माणूस व्यर्थ हिकडे तिकडे फिरतो देशाचे पाठीमागें आर्पण आपले पाठीमागें नसीब.

६९ दुष्ट व श्रीमंत मातीचा आहे पण वर सोन्याचा मुलामा आहे. आणि भिकारी व सुष्ट मातीचा आहे वर मुलामा मातीचाच आहे. यास धर्माचा प्रसाद त्यास दुर्योधनाचा वर. चांगले मनुष्य विपत्तींतही सुखी आहेत. व दुष्ट मनुष्य संपत्तींत असूनही दुःखी. ज्याला सुख आणि प्रतिष्ठा आहे तो गरीबाची काळजी वागवीत नाहीं. त्यास इतकें सांगावें कीं यालोकांतील सुख आणि थोरपणा परलोकीं तुला मिळणार नाहीं.

७० मत्सर करणारा पुरुष इश्वराचे उ दारपणास शब्द ठेवितो. व चांगले मनुष्या शी दुष्टपणा करितो. एका दुष्ट माणसास ए कानें पाहिलें तों एका श्रीमंतास शिव्यागाळी करीत चालला आहे तो त्यास ह्मणाला अरे तूं भिकारी आहेस ह्मणून ज्यास इश्वरानें श्री मंती दिल्ही आहे त्याणी काय तुझा अपराध केला. अरे तुह्मी कोणीएक दुष्ट माणसाचें वाईट चिंतूनका. कारण तो आपला आपण वाईट चिं तिणार आहे त्यापेक्षां ज्या मनुष्याचे पाठीमागे शत्रु नाश करावयास लागला आहे तसल्या मा णसास आपण शत्रु काय व्हावें.

७१ ज्या शिष्यास शिखण्याची इच्छा ना हीं तो निर्धन स्त्रीव्यसनीपुरुषासारखा आहे आणि मुसाफर आहे त्यास रस्ता माहीत नाहीं तर पक्षी भग्नपक्षा सारखा आहे व विद्वान् आणि अ विद्वाना सारखी कृती तो निर्फळ वृक्षासारखा आ हे. आणि अज्ञान संन्यासी निर्द्वार गृहासारखा ओ

आहे.

७२ श्रीव्यासानी लिहिली आणि ईश्वरानें सांगीतली याचें कारण असें आहे कीं त्याप्रमाणें कोणी वर्तुन चांगलेपणा धरील रोज लिहिलेले श्लोक वाचावे आणि पोथी चांगली रंगीत चित्रित करावी म्हणून नाहीं. अज्ञान तपस्वी पायानें चाल णारासारखा आहे आणि विद्वान गेरवर्तणुकेच्या घोड्यावर निजल्यासारखा आहे. आणि मूर्ख मनु ष्यानें ईश्वराची स्तुती एकदां केली आणि तपस्वी याणें ढोंग कितीएक वर्षे केलें तरीं बराबर नाहीं. चोपदार भला आणि कृपाळू बरा पण राजा दुष्ट वाईट.

७३ विद्वान अकर्मी निर्मध मोहोळा सारखा आहे. मध माशीजवळ मध नाहीं तर तिणें इतकीच करावी.कीं कोणांस चाऊं तरीं नये.

७४ ज्या मनुष्यांस धीर नाहीं तर स्त्री आहे. संत देशावर नजर ठेविते. तोदरवडे खोर आहे. अरे तूं लोकांस दाखविण्याकरितां हावीणा व-

ह्या चिपळ्या घेतल्या आहेस पण तुझें कर्म
अंतःकरणांत ठीक नाहीं तेव्हां काय उपयोगी
येईल हें ढोंग. संसार टाक मग विण्याचिपळ्या
असोत नसोत.

७५ दोन मनुष्याचे हृदयांतील दुःख
जात नाहीं व त्याचा हात वरती होत नाहीं एक
ज्या सावकाराचें तारूं बुडालें व ज्याचा मुल
गा लुच्चा निघाला. थोर मनुष्याच्या शिरपा-
वा पेक्षां आपली घोंगडी चांगली. आणि ता
टांतील दुसऱ्याच्या येथील जेवणापेक्षां आ
पले घरची पत्रावळ बरी. आणि आपले मेह
नतीची आंबील बरी पण पक्कानें थोराचे आ
र्जवानें खाणें नको.

७६ दोन गोष्टी केल्या असतां बुद्धीस
विपर्यास आहे आणि शाहण्याच्या मत्तीचा अ
पमान आहे. एक ज्यावर विश्वास नाहीं त्याचे
औषध खाणें आणि सोबती नसतां गैरमाहीत
रस्त्यांत चालणें.

७७ एका विद्वानास पुसलें कीं तुला इतकी विद्या आणि थोरपणा कशानें प्राप्त झाला त्याणें उत्तर केलें कीं जें मला कळलें नाहीं तें पुसून घेण्यास मी लाज बाळगिली नाहीं चांगला वैद्य मिळेल तेव्हां प्रकृत नीट होण्याची आशा. तसें जी गोष्ट ठाऊक नाहीं ती विचारकरण्यास लाज नधरितां आळस करणार नाहींस तरच तुला शाहणे होण्याची उमेद.

७८ जें आपल्यास कधीं तरी कळेल असें आहे तें पुसण्याची काळजी करूं नये. कारण त्यांत अप्रतिष्ठा आहे. एका मनुष्यानें एका वैद्यास चमत्कार दाखविला तो त्यास ज्याणें शिकविला तो त्यास शिकविणार होता. तेव्हां त्याणें त्याविशीं त्यास पुसिलें नाहीं पुढें तो त्यास प्राप्त जाहला तेव्हां आपल्या आपणच समजेल.

७९ शाहणपणाची गोष्ट असी आहे कीं संसार तरी करून संपत्ती संपादन करावी

वे तों भाषण करूं नको. कारण कीं खरें जरी पु सत्या खेरीज. बोललें तरी कोणी तुला चांगलें ह्मणार नाहीं.

८३ एकवेळ एकास लज्जा स्थानी दुखा पत झाली होती त्याचा यजमान त्यास पुसे कीं तुझा रोग कसा आहे परंतु कोठे आहे हें कधीं त्याणें पुसलें नाहीं. कारण कीं तो समजत असें बोलावें कोणचे नबोलावें कोणचें आणि जो बोलण्यांत प्रश्न करण्यांत विचार करितो तो उत्तर ऐकोन फजीत होत नाहीं. भाषण यथार्थ आहे असें तुला गऊक नसेल तर तें इच उघडूं नको. कारण कीं खरें बोलून कैद जालास तर पुरवेल पण खोटें बोलून सुटणें नको.

८४ खोटें बोलणें असें आहे कीं जशी जखम बरी जाहली तरी वण राहतो. एकदां खोटें बोलण्याची सवय पडली ह्मणजे खरें बोललें तरीं खोटेंच ह्मणतात. देवानें सां

गीतलें आहे कीं खोड्याची शिक्षा ज्याचीत्या- लाच होईल. येकाचा खरें बोलण्याचा स्वभा- व होता त्याणे खोटें केलें तेंही खरें झालें व येकाने खोटें बोलण्याचा प्रघात घातला त्या- णे खरें केलें तेंहीं खोटें झालें.

८५ ईश्वराने सृष्टी निर्माण केली त्यांत स- र्वांहून शुध्ध माणूस आहे आणि श्वान सर्वांहू- न अशुध्ध आहे परंतु ज्ञाते ह्मणतात कीं स- त्यपणाने वागणारा कुत्रा असत्यपणाने वागणा रे मनुष्यापेक्षां उत्तम. तात्पर्य खराबमनुष्याचे वाटेस जाऊनये. जसे दगडाच्या चित्रावर कि तीही काठ्या मारल्या तरी नौबतीचा अवाज निघणार नाहीं तसें जन्मपर्यंत हलक्यामनुष्या चें आर्जव केलें तरी तो येकादे दिवशी थोडक्य गोष्टीकरितां प्राण घेण्यास उभा राहील.

८६ इंद्रियसुखांत जो निमग्न असतो त्यास विद्या होत नाहीं आणि ज्यास विद्या ना हीं त्यास थोरपणा नाहीं— जो बेल बहुत खा

णारा आहे त्याजवर दया करूनये कारण कीं जो बहुत खाणारा तो बहुत मूर्ख–जर तुला ताजें व्हावयाचें असेल हत्तीसारखें तर गाढवासारखी मेहेनत करावीलागेल.

८७ ग्रंथीं लिहिलें आहे कीं मनुष्यास देवाने श्रीमंती दिल्ही तर देवाची आठवण राहात नाहीं आणि गरीबी दिल्ही तर काळजी करीत राहतो तेंव्हां देवाची भक्ती केंव्हां कशी व्हावी. खाण्यास मिळालें ह्मणजे गर्व आणि आळस आणि खाण्यास मिळालेंनाहीं ह्मणजे दुःख आणि काळजी या दोनीं अवस्थेंत ही व्यवस्था तस्मात ईश्वराचें स्मरण केंव्हां होईल नजाणो.

८८ ईश्वरइच्छेने राजाही सिंव्हासनाखालीं येतो आणि वाघाचे तोंडांत सापडलो तरी निभतो तस्मात त्या भगवंताचें स्मरण होईल तोच सुदिन प्राण जात असलातरी चिंता नाहीं.

८९ ईश्वराने अवकृपा केली तर ऋषीही

भ्रष्ट होतील आणि त्याचे कृपेने राक्षसही देव होतील.जर ईश्वराने परलोकीं पुसलें कीं काय केलेंस तर चांगलें उत्तर ऋषींच्यानेही देववणार नाहीं तस्मात हे भगवंता कृपाचकर तर पाप्याचा परिणाम नीट आणि त्याची तीच आज्ञा आहे.

१० जो कोणी संसारांत पुण्य करीत नाहीं तो परलोकीं दुःख पावतो. याविषयीं वचन आहे कीं-ईश्वर परलोकीं शासन करील-आणि दुःखांत घालील. थोरांचें सांगणें दुःखकारक आहे तेंव्हां त्याप्रमाणे कोणी चालत नाहीं- शाहणे जे आहेत ते आपले पूर्वी लोक झाले त्यांचे वर्तणुकीच्या गोष्टी कथा ऐकून शाहणे होतात आणि जे शाहणे आहेत ते चांगलेरीतीने वागतात कीं आपल्या पुढे जे होतील तेही त्याप्रमाणेंच आपले उदाहरणाने शाहणे व्हावे. जाळ्यांत येक पक्षी सापडला ह्मणजे तिकडे दुसरा येत नाहीं अशी दुसऱ्याची व्यवस्था पाहून येक शाहणा होतो यास्तव आपलें उदाहरण दुसऱ्यास देऊनको

११ ज्याला कान नाहीं तो काय ऐकेल आणि ज्याजवर फास टाकला तो काय पकून जाईल. आंधेरी रात्र ईश्वराची कृपा झाली तर दिवस होतो. दौलत मेहेनतीने येत नाहीं पण ईश्वर कृपा करितो तेंव्हां येते. यास्तव हे भगवान मी कोणास हाक मारुं तुझ्याशिवाय माझें ऐकणार कोण आहे तू ज्यास साह्य करशील तोच रस्त्याने जाईल आणि तू सोडलासतर मग कोण हात धरणार आहे.

१२ चांगल्ये चालीचा भिकारी बरा पण वाईटचालीचा राजा वाईट- प्रथम दुःख मग सुख पत्करलें परंतु आदी सुख आणि अंती दुःख नसावें.

१३ आकाशांतून पर्जन्य पडून जमीन सुखी होत्ये आणि त्याबद्दल आकाशास [illegible] उपयोग मातीमात्र उडोन वर जात्ये जें विहिरीत तें पोहोय्रांत. माझी चाल वाईट आहे असें जरी तुला कळलें तरी तू आपली चांगली चाल सोडू

नको· ईश्वरही अपराध पाहून क्षमा करितो पण शेजारी नपाहतां दुर्वार्ता उठवितो· हे भगवन र क्षण कर्ता तूं आहेस जर गोष्टी मनुष्यास कळ त्या तर कोणी सुख पावलानस्ता येकाचे का मांत दुसरा बळेंच हात घालता पण समजत नाहीं ह्मणून बरें·

९४ खाणींत खणलें ह्मणजे सोनें निघतें पण कृपणाचा प्राण गेल्याखेरीज मिळणार नाहीं– कृपण ह्मणतो कीं खाऊंनये पण जपून ठेवावें कारण कीं भोगल्यापेक्षां आशा राखल्याचें सुख विशेष– त्याचा शेवट असा होतो कीं शत्रूच्या इच्छेप्रमाणे येकेदिवसीं द्रव्य भूमींत राहतें

९५ जे आपल्येपेक्षां लाहानावर कृपा करीत नाहींत ते आपल्याहून वरिष्ठाचे हातून दुःख पावतात– जोरदार आहे तो गरीबास मारितो असें सर्वत्र घडत नाहीं यास्तव गरीबास दुःख देउ नको– का कीं तुझ्याहून जे जोरावर आहेत· ते तुझें असेंच करतील·

भांडतात त्यांस समजून सांगण्याकरितां पण जो शाहणा असेल त्याणे काजीकडे कधी जाऊं नये. जें वाजवी घावयाचें असेल तें घरांतलेघरांत दिल्हें तर बरें मग दुःखाने घावें त्यांत काय हशील. जर पट्टीचा पैसा वेळेस पोंचविला तर भालेकरी कशास तगादा करतील.

१०३ सर्वलोकांची जी कज्जा करितां करितां सुखते पण काजीचे जिभेस पाणी सुटतें. काजीला येक खिरा लांच दिल्हा ह्मणजे दाहा काकडयांचा दावा शाबूद करितो.

१०४ कसबीण ह्मातारी झाली ह्मणजे मी पाप करणार नाहीं ह्मणून शपत वाहते व पश्चात्ताप करिते. व फौजदार कामावरून हाकून दिल्हा ह्मणजे मी कोणास इजा देणार नाहीं ह्मणतो पण सामर्थ्य गेल्यावर या बोलण्याचा उपयोग काय. यास्तव जोंपावेतो ह्मातारपकाळ झाला नाहीं तोंच देवाचें भजन करावें स्वस्थ बसून ह्मातारपण आल्यावर मग स्वस्थ बसेल तर काय

आश्चर्य फिरवतच नाहीं.

१०५ येका शाहण्यास प्रश्न केला कीं मोठाले उंच फलयुक्त वृक्ष ईश्वराने उत्पन्न केलेआहेत परंतु सरूकांहीं फळदेतनाहीं असेंअसतां त्यास मुक्त ह्मणण्याची गरज काय- त्यानें उत्तर सांगितलें कीं सर्व वृक्षांस हंगाम आहेत त्या काळी ते फळ देतात आणि नंतर विशोभीत दिसतात- व सरू बारा महिने सारखा यास्तव त्यास मुक्तवृक्ष ह्मणतात- कितीयेक राजे पृथ्वीवर होऊनगेलेतरी नद्या वाहतात त्या वाहतच राहतील यास्तव जर तुला सामर्थ्य असलें तर उदारपणा धर नाहींतर सरू सारखा मुक्त राहा नेहेमी आनंदांत. मनुष्यास मरणकाळीं दोनप्रकारचीं दुःखें होतात तीं अशीं कीं येक संपत्ती मिळविली आणि भोगिलीनाहीं. व दुसरें असें कीं ज्ञान शिकला आणि वर्तणूक तशी केली नाहीं. जर कृपण असेल आणि विद्वान असला तरी त्यास दूषण लावितात. व मोठा मूर्ख असला आणि उदार धार्मिक असेलतर त्याची

# शुद्धीपत्र.

| पृष्ठ. | ओळ | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | ११ | पुष्पवान. | पुष्पवन. |
| २ | ६ | ज्यास. | यांस. |
| २ | ९ | आहे. | आहेकींकाय |
| ९ | २ | ती. | ते. |
| ९ | ५ | बीज | ब्रीज. |
| ३८ | ५ | फारचा. | फारच. |
| ४३ | २ | लिहिली. | गीतालिहिली |
| ५६ | ७ | जी. | जीभ. |